सायन -पनवेल महामार्गावरील स्थानिकांना
आकारण्यात येणाऱ्या टोलच्या प्रश्नाबाबत
समिती स्थापन करण्याबाबत........

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

## शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२००६/प्र.क्र.१८१/रस्ते-९अ

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: १६.०७.२०१४

**प्रस्तावना —**

खाजगीकरणातर्गंत सुरु असलेल्या सायन-पनवेल या नव्या महामार्गावर कामोठे येथील प्रस्तावित टोल नाक्याच्या विरोधात स्थानिक नागरिकांनी आंदोलनाची भूमिका घेतली असून या संदर्भात दिनांक १२.०७.२०१४ रोजी मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली बैठकीचे आयोजन सह्याद्री अतिथिगृह येथे करण्यात आले होते. या बैठकीस ठाणे जिल्ह्याचे पालकमंत्री श्री. गणेश नाईक तसेच आमदार श्री. प्रशांत ठाकूर यांच्या नेतृत्वाखालील शिष्टमंडळ उपस्थित होते. शिष्टमंडळाने पनवेल, कळंबोली, कामोठे, खारघर येथील रहिवाशांना त्याचा दैनंदिन प्रवासासाठी सदरचा टोल हा अत्यंत त्रासाचा होणार असुन सदर टोलनाक्यामुळे महाराष्ट्रातून मुंबईकडे येणाऱ्या वाहनांना १५ कि.मी.च्या अंतरामध्ये दोन वेळा टोल भरावा लागणार आहे असे निदर्शनास आणले. त्यासाठी कामोठे येथील प्रस्तावित टोलनाक्यावर स्थानिकांना सूट देण्याची किंवा सदर पथकर स्थानक कार्यान्वीत न करण्याची मागणी लोक प्रतिनिधीनी केली आहे. मा.मुख्यमंत्र्यांनी शिष्टमंडळाचे म्हणणे ऐकूण घेतले व मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती तातडीने नियुक्त करण्याचा निर्णय जाहीर केला. सदर समिती एक महिन्याच्या आत शिष्टमंडळाने केलेल्या मागण्यावर विचार करुन आपला अहवाल शासनास सादर करेल. त्याअनुषंगाने खालील प्रमाणे समिती स्थापन करण्याचे प्रस्तावित आहे.

**शासन निर्णय—**

सायन-पनवेल महामार्गावरील स्थानिकांना आकारण्यात येणाऱ्या टोलच्या प्रश्नाबाबतचा निर्णय घेण्याकरीता समितीची स्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४. | सचिव (रस्ते) | सदस्य |
| ५. | मुख्य अभियंता व सह सचिव | सदस्य सचिव |

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाचे (MSRDC) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक (VCMD) तसेच शहर व औद्योगिक विकास महामंडळाचे (CIDCO) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक (VCMD) विशेष आमंत्रित असतील.

**समितीचे कार्यकक्ष**

१. पनवेल, कळंबोली, कामोठे, खारघर येथील स्थानिक रहिवाशांना टोल मधून सूट अथवा सवलतीबाबत अभ्यास करुन शिफारस करणे

२. महाराष्ट्रातून मुंबईकडे येणाऱ्या / बाहेर जाणाऱ्या वाहनांना १५ कि.मी.च्या अंतरामध्ये दोन वेळा टोल भरावा लागणार असुन त्याबाबत अभ्यास करुन विविध पर्याय सुचविणे.

३. सदर टोलनाका बायबॅक करावयाचे असल्यास विविध पर्याय सुचविणे.

सदर समिती एक महिन्यात शिष्टमंडळाने केलेल्या मागण्यावर विचार करुन आपला अहवाल सादर करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११२२३५६१४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Natthuji Dekate

Digitally signed by Mahesh Natthuji Dekate
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Natthuji Dekate
Date: 2014.07.21 12:22:14 +05'30'

**(म.न.डेकाटे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
२. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन) विभाग,मंत्रालय, मुंबई
४. सचिव (रस्ते.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय ,मुंबई
५. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
६. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ. मुंबई.
७. मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय ,मुंबई
८. कार्यासन रस्ते-९अ, संग्रहार्थ